व सिंहलद्वीपांतले लोकहि सेवेकरितां इकडे असत. वेताच्या खुर्च्यांसारखीं आसनें असल्याचें दिसतें. ' **विचित्रवर्णकंबलः** ' गालिचे होते. न्यायाधिकारी, व कारकून होते. " **बलभद्रमिव कादंबरीरसविशेषवर्णनाकुलम्** ' यावरून त्या वेळीं या **कादंबरी**प्रमाणें दुसऱ्या कादंबऱ्या किंवा कथा होत्या, असें दिसतें. स्त्रियांप्रमाणें अनेक पंथी पुरुषहि एकत्र बसत असल्याचें आढळतें. उन्हांत वगैरे परिश्रम केल्यानंतर कमलतंतु चोखण्याचें वर्णन आढळतें. ताडाचे पंखे होते. **गणपती**चाहि उल्लेख **बाणा**च्या दोन्ही ग्रंथांत व **हर्षा**च्या ग्रंथांत आहे. **महाश्वेता** ब्रह्मासन व ब्रह्मसूत्र घालून अघमर्षण करीत असल्याचें वर्णन आहे. अतिथीचे पाय धुण्याची व आदरसत्कार करण्याची चाल होती. चित्रें काढण्याकरिता कुंचली असे. कारंजीं असल्याचें आढळतें. वस्त्रभूषणें व तांबूल देऊन सत्कार करण्याची चाल होती. वस्त्रें भट्टींत घालीत असल्याचें आढळतें. बायकांच्या हातांत मंगलवलयें ( बांगड्या ) असत. देव, ऋषि, पितर यांचें ऋण असल्याची समजूत होती. पति आला असतां स्त्रियांनीं उठून उभें राहण्याची चाल होती. सूनमुख पाहण्याचें कौतुक होतें. मृत्तिका, काष्ठें, पाषाण यांच्या प्रतिमेचें पूजन होत असल्याचें आढळतें. पाणी पाजण्याकरितां पुत्र असावा अशी समजूत होती. वसंतात ( शिमग्यांत ) बाजेवर वृद्धस्त्री व पुरुष यांचा विवाह करून थट्टा करण्याचे वगैरे बीभत्स प्रकारहि असल्याचें आढळतें ! ' **वीणामुकररुहव्यापारान्** ' यावरून सतार, सारमंडलासारखीं वाद्यें होतीं. गांवाला जातांना वडिलांस नमस्कार करण्याची व त्यांचा आशीर्वाद घेण्याची, तसेंच गुरू व वडील बसल्यानंतर थोडें दूर बसण्याची व आशीर्वाद सांगण्याची चाल होती. देवतांस पुष्पें अर्पण करण्याची चाल होती. मंगलकार्यांत सुवासिनींची गर्दी असल्याचें वर्णन आढळतें. राजांच्या येथें सुगंधि तेलांचा दीप लावण्याची व लग्न लागण्याच्या पूर्वीं वधूवरांकडून कांहीं गमतीचे प्रकार करविण्याचीहि चाल आढळते; ह्या प्रसंगीं आप्तमित्रांच्या स्त्रिया मात्र असल्याचें दिसून येतें. या ठिकाणास ' कौतुकगृह ' असें ह्मटलें आहे. राजाच्या येथें नृत्य, गीत, वाद्यवादन, वगैरे प्रकार होते. राजाजवळ शिरोरक्षणाकरितां खड्गधारी सज्ज असे. राजा दमून आला असतां परुषांनीं वारा घालण्याची चाल होती. आनंदोत्सवांत मद्यानें धुंद होऊन चांभार जोरानें नगारे वाजवीत असल्याचें आढळतें. दौंडी पिट्टवि-

ण्याचा प्रघात होता. मोहोर बंद करण्याचें माहित होतें. हत्तींच्या कानांवर शंखांच्या माळा भूषणासारख्या घालीत असत. कार्यांत श्रीफलें घेऊन जाण्याचा प्रघात होता. जाणत्या मुलांनां निजविण्याच्या वेळेस वृद्ध स्त्रिया गोष्टी सांगत असल्याचा प्रचार होता. लोहचुंबकाची माहिती होती. दोन पाय, दोन गुडघे व मस्तक अशा पंचांगांनीं नमस्कार करण्याचा प्रघात होता. संहिता, पदें, क्रम ह्मणण्याचा पाठ होता. क्षयकालीं बारा सूर्य उगवत असल्याचें वर्णन आढळतें. महानवमी ( आश्वीन शु० ९ ) च्या दिवशीं टोणगे मारण्याची चाल असावी. व ती दशमीस ह्मणजे दसऱ्याच्या दिवशीं चालू झाली असें दिसतें. वाघ धरण्याकरितां सापळे होते. मोरांच्या पिसांची छत्री असल्याचें आढळतें. गुरू, देव, साधू यांचें आराधन केलें असतां मनोरथ पूर्ण होतात अशी समसूत होती. हस्तिदंती राजमंदिरें असल्याचें वर्णन आहे. स्त्रियांच्या गालावर वेलबुट्टी काढीत असत. राजांच्या येथें कुब्ज वामन षंढ हे नौकर असल्याबद्दल, अनेक पशुपक्षी संग्रहास असल्याबद्दल, तसेंच गंधी तांबोळी हे संग्रहास असल्याबद्दल आढळतें. त्यावेळीं **भगवद्गीता महाभारतांत** असल्याचा उल्लेख आढळतो. परकीय लोक काष्ठ तोडण्याकरितां आले असतां कुऱ्हाडी हिसकून घेण्याची आणि खांद्यावर कुऱ्हाडी टाकून न्याहारी बांधून रानांत जाण्याची चाल होती. दुखणें जाण्याकरितां दानधर्म करण्याचा प्रघात होता. प्रयाणकालीं व दिवसवेळा दाखविण्याकरितां शंखनाद करण्याचा प्रचार होता. शिंकीं टांगून त्यांवर पदार्थ ठेवण्याची चाल होती. रहाटगाडगें होतें. पुत्रजन्मोत्सवाच्या वेळीं बंदिवानांस सोडण्याची, बाळंतविडे नेण्याची व मंत्रघोषानें भूतबाधा घालविण्याची चाल होती. दुखणाइताकरितां पाणी कढवून सच्छिद्रपात्रांतून गाळीत असल्याचें आढळतें. पतीसमोर—विशेषेंकरून लग्नांत—वधूनें खालीं मान घालून बसण्याचें व वस्त्रानें तोंड झाकण्याचें आढळतें. उपाध्याय शांत्युदक शिंपडीत असल्याचें, जावयाचा आदरसत्कार करीत असल्याचें, बोहल्यावर सुपांत शमी, समिधा, लाह्या, दर्भ, ठेवीत असल्याचें आढळतें. वधूवरांच्या शयन—मंदिरांत मंगलदीप, अशोकवृक्ष, व त्याखालीं धनुष्यबाण धारण करणारा मदन काढीत असत. आचमन करून दानधर्म करण्याची चाल होती. दुखणाइताच्या खोलीचीं दारें बंद करण्याची चाल होती. हरिणांनीं [illegible], ह्मणून तृणादिकांचे पुरुष करून शेतांत बसवीत असल्याचें आढळतें. राजेलोक

स्वारींत गवतांचीं व झाडांच्या फांद्यांचीं मंदिरें उभारीत व वस्त्रांची पालें देत असत. राजकन्यांनां नृत्यगीत व लेखन इत्यादिक शिकविण्याची चाल होती, व त्या तारुण्यांत आल्यावर लग्न करण्याची चाल होती. मुलांनां व इतर कांहीं जातींनां झुलपें होतीं. ब्राह्मणांच्या येथें यज्ञ चालू असतां शूर लोक व राजे हजर असत. काव्यादिकांनीं मनोरंजन करीत असत. चंदनाची उटी व त्यावर केशराचे ठिपके देत असत. तालीमजोड्या, मल्लखांब इत्यादि साहित्यें होतीं. केरल व मालव देशच्या स्त्रियांचे गाल मद्यानें आरक्त असल्याचें आढळतें तांबडे पीतांबर होते. कुत्र्यांच्या गळ्यांत कवड्यांच्या माळा असत.

